**महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास बसस्थानकाचे आधुनिकीकरण व इतर सोयी सुविधा करण्याकामी रु.३८.९८ <u>कोटी इतका निधी वितरीत करण्याबाबत....</u>**

## <u>महाराष्ट्र शासन</u>

## गृह विभाग

**शासन निर्णय :-क्र.एसटीसी-०५२४/प्र.क्र.४३/परि-१**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २९ मार्च, २०२५.

**<u>संदर्भ :-</u>** १) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.राप/लेखा/अवंवि/५९४, दिनांक २४.०३.२०२५.

२) शासन निर्णय क्र.एसटीसी-१०२४/प्र.क्र.१५३/परि-१, दि.०४.०२.२०२५.

**<u>प्रस्तावना :-</u>**

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास रा.प. बसस्थानकांचे आधुनिकीकरण/पुनर्बांधणी, बसखरेदी, विद्युत प्रणालीवर चालणाऱ्या बसेसकरीता चार्जिंग स्टेशन उभारणे व इलेक्ट्रीक वाहने भाडेतत्त्वासाठी व्यवहार्यता पूरक निधी इत्यादी विकास कामांसाठी निधीची आवश्यकता असल्याने सन २०२४-२५ च्या अर्थसंकल्पामध्ये रा.प महामंडळाच्या बसस्थानकाचे आधुनिकीकरण व इतर सोयी सुविधा कार्यक्रमाअंतर्गत "३०५५ ००५२-३५ भांडवली मत्तेच्या निर्मीतीकरीता अनुदान" या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पीत करण्यात तरतूदीतून सन २०२३-२०२४ व सन २०२४-२०२५ मधील प्रगतीपथावरील बांधकामांची कामे पूर्ण करण्यासाठी रु.३८.९८ कोटी इतका निधी वितरीत करण्याबाबत उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांनी संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये शासनास विनंती केली आहे. त्याअनुषंगाने, सदर लेखाशीर्षाखाली वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेला निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास "३०५५ ००५२-३५ रा.प महामंडळाच्या बसस्थानकाचे आधुनिकीकरण व इतर सोयी सुविधा कार्यक्रमाअंतर्गत" या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२०२४ व सन २०२४-२०२५ मधील प्रगतीपथावरील बांधकामांची कामे पूर्ण करण्यासाठी रु.३८.९८ कोटी **(अक्षरी रूपये अडतीस कोटी अठ्ठयाण्णव लक्ष फक्त)** रोखीने प्रदान करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर रु.३८.९८ कोटी हा खर्च सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा आणि सदर खर्च "मागणी क्रमांक बी-३, ३०५५ मार्ग परिवहन ००-१९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपकामांना सहाय्य (००) (००) (०१) महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ

बसस्थानकांचे आधुनिकीकरणांतर्गत बांधकाम व इतर सोयी सुविधा (३०५५ ००५२) ३५ भांडवली मत्तेच्या निर्मीतीकरीता अनुदान” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. सदरचे अर्थसहाय्य हे “सशर्त” आहे.

३. यासाठी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांच्या कार्यालयातील आंहरण व संवितरण अधिकारी असलेले लेखाधिकारी यांनी सदर रक्कम उपमहाव्यवस्थापक (वित्त), महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मध्यवर्ती कार्यालय, महाराष्ट्र वाहतूक भवन, मुंबई यांचे नावे नव्याने उघडण्यात आलेल्या “आभासी वैयक्तिक ठेव लेखा खाते” (Virtual Personal Deposit Account) मध्ये सुपुर्द करावी.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२२८/२०२५/व्यय-८, दि.२७.०३.२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३२९१५०१०६६२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SARIKA ASHISH GANVIR

Digitally signed by SARIKA ASHISH GANVIR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=355d31d0cf7bf8d02352945a11a765b0f536fe1adfd0fff4aad6f9dd87f3d76b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D50DB68513E91376BA0547B675FDF1B1F3E1AB721046013C8F2C377536F96AC5, cn=SARIKA ASHISH GANVIR
Date: 2025.03.29 15:02:33 +05'30'

**( सारिका मेंढे (गणविर) )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन , मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
५) मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
६) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
७) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
८) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
९) अपर मुख्य सचिव (परिवहन), मंत्रालय, मुंबई.
१०) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
११) खाजगी सचिव, मा.मंत्री (परिवहन) महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
१२) खाजगी सचिव, मा.राज्यमंत्री (परिवहन) महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
१३) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
१४) वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
१५) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.

१६) महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई

१७) कक्ष अधिकारी (व्यय-८, अर्थ-११), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१८) गृह विभाग, बीयुडी-१, मंत्रालय, मुंबई

१९) निवडनस्ती कार्यासन परि-१, गृह विभाग, मंत्रालय,मुंबई.